उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांचे अधिपत्याखालील प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी यांची १३७ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०२४/प्र.क्र.१२९/आरोग्य-४**
**१० वा मजला, संकुल इमारत,**
**गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मंत्रालय, मुंबई**
**तारीख: ०२ मे, २०२४**

वाचा:-

१) सहसंचालक, आरोग्य सेवा (प्राआकेंद्र/उपकेंद्र/दवाखाने), मुंबई यांचा प्रस्ताव क्र.आआसे/कक्ष-७अ/टे-६/उप.कोल्हापूर/वै.अ.गट-अ/अस्थाई पदे/१४०६-०७/२०२४, दिनांक २०.०३.२०२४.

२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.मुदतवाढ-२०२३/प्र.क्र.२७३/आरोग्य-४, दिनांक १६.१०.२०२३.

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१.०२.२०२४.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांचे अधिपत्याखालील प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी यांची १३७ अस्थायी पदांना दि. २९.०२.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदतवाढ संपुष्टात आल्याने आणि सदर पदांची यापुढेही आवश्यकता असल्याने सदर पदांना दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांचे अधिपत्याखालील प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी यांची १३७ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत आयुक्तालयाकडून प्रस्ताव सादर करण्यात आला आहे.

२. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या “परिशिष्ट-अ” मध्ये नमूद करण्यात आलेल्या उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांचे अधिपत्याखालील प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी यांची १३७ अस्थायी पदांना दिनांक दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर अस्थायी पदांचे वेतन पुढील लेखाशिर्षामध्ये खर्ची टाकण्यात यावे आणि हा खर्च सन २०२४-२५ या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

| अ.क्र. | लेखाशिर्ष |
|---|---|
| १ | मागणी क्रमांक आर-१ मुख्य लेखाशिर्ष “२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, ००१-संचालक व प्रशासन, (०१) (०४)-गट वैद्यकीय अधिकारी (२२१००३७१)” |

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१.०२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर पदांना यापुढील कालावधीकरीता मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना या सोबतच्या “परिशिष्ट-अ” मधील तक्त्यात प्रत्येक आरोग्य संस्थेचे नाव, एकूण मंजूर पदे, स्थायी पदे व अस्थायी पदे (तपशिलवार माहिती) याबाबतच्या माहितीसह शासनास सादर करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०४२९१२२७००७३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NEELAM GIRISH SANGWAI

Digitally signed by NEELAM GIRISH SANGWAI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=a9bbc429d62201a67249f70e60acdfadbff901fbbbf45cc393dbd6aa91fbd6ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=81E4E52421D72A2AE32DF6C7D06ABB4E6A7B5820C3A929F328AD6C0DCA4F38C7, cn=NEELAM GIRISH SANGWAI
Date: 2024.05.02 15:42:09 +05'30'

( नीलम संगवई )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई /नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) मुंबई.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर
७. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, कोल्हापूर, सांगली, रत्नागिरी, सिंधुदुर्ग.
८. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर, सांगली, रत्नागिरी, सिंधुदुर्ग.

९. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर, सांगली, रत्नागिरी, सिंधुदुर्ग.

१०.सर्व संबंधीत रुग्णालये व कार्यालये (संबंधीत उपसंचालक, आरोग्य सेवा यांचेमार्फत)

११.वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई

१२.अवर सचिव / कार्यासन अधिकारी, (सेवा-१/सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

# “परिशिष्ट-अ”

(शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अपदे-२०२४/प्र.क्र.१२९/आरोग्य-४,
दिनांक ०२.०५.२०२४ सोबतचे विवरणपत्र)

**उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ यांचे अधिपत्याखालील जिल्हा परिषदेकडील प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी गट-अ**

| अ.क्र. | आरोग्य संस्थेचे नाव | एकूण मंजूर पदे | स्थायी पदे | अस्थायी पदे (पदनांम व पदसंख्या) |
|---|---|---|---|---|
| १ | आरोग्य विभाग, जिल्हा परिषद, कोल्हापूर | १८१ | १४३ | ५१ |
| २ | आरोग्य विभाग, जिल्हा परिषद, सांगली | १२८ | ८५ | ४३ |
| ३ | आरोग्य विभाग, जिल्हा परिषद, रत्नागिरी | १०५ | ७७ | २८ |
| ४ | आरोग्य विभाग, जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग | ७६ | ६१ | १५ |
| | **एकूण** | **४९०** | **३५३** | **१३७** |

***********